**ठाणे कोषागार कार्यालयात १३ पदे व पुणे कोषागार कार्यालयात ११ पदे** वर्ग करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक :सेवाप्र.२०.११/प्र.क्र.७९/कोषा (प्र-३)
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २१ एप्रिल, २०११.
वाचा : शासन निर्णय क्रमांक सेवाप्र २०.०८/प्र.क्र.७९/१/कोषा.प्रशा.३, दि.२८.५.२००८

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय दिनांक २८/०५/२००८ व शुध्दीपत्रक दिनांक १८/०८/२००८ अन्वये मंजूर पदांच्या आकृतीबंधानुसार संचालनालय, लेखा व कोषागारे, मुंबई या कार्यालयासाठी एकूण १८३ पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. कोषागार कार्यालय, ठाणे व कोषागार कार्यालय पुणे या कार्यालयात वाढत्या कामाचा निपटारा करण्याच्या दृष्टीने सध्या असलेला कर्मचारी वर्ग अपुरा पडत आहे. त्याअनुषंगाने लेखा व कोषागारे, मुंबई कार्यालयातील सहाय्यक लेखा अधिकारी संवर्गातील सध्या १ पद रिक्त असून टिप्पणी सहाय्यक/कनिष्ठ लेखापाल संवर्गातील ७ पदे तर लिपिक टंकलेखक संवर्गातील ४ पदे अशी एकूण १२ पदे तसेच सहाय्यक अधीक्षक संवर्गातील ३ पदे उपलेखापाल संवर्गात रुपांतरीत करून ती ३ पदे अशी एकूण **१५ पदांपैकी ९ पदे कोषागार कार्यालय ठाणे येथे व ६ पदे कोषागारे कार्यालय, पुणे येथे तेथील वाढीव कोषागार कामकाज विचारात घेता कायमस्वरुपी वर्ग करण्याबाबत** तसेच सहसंहचालक, लेखा व कोषागारे, कोकण यांचे कार्यालयातील लेखालिपिक या संवर्गातील १ पद तसेच रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग या तीनही कोषागार कार्यालयातील लेखालिपिक संवर्गातील प्रत्येकी १ पद **अशी एकूण ४ पदे ठाणे कोषागार कार्यालयात तसेच सहसंचालक**, लेखा व कोषागारे, पुणे कार्यालयातील लेखालिपिक संवर्गातील १ पद व सातारा, सांगली, कोल्हापूर या कोषागार कार्यालयातील वरीष्ठ लिपिक या संवर्गातील प्रत्येकी **१ पद पुणे** कोषागार कार्यालयात अशी एकूण **ठाणे कोषागार कार्यालयात १३ पदे व पुणे कोषागार कार्यालयात १० पदे** कायमची वर्ग करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

संचालनालय, लेखा व कोषागारे, मुंबई या कार्यालयामधून सहाय्यक लेखा अधिकारी संवर्गातील १ पद, टिप्पणी सहाय्यक/कनिष्ठ लेखापाल संवर्गातील ७ पदे, लिपिक टंकलेखक संवर्गातील ४ पदे अशी एकूण १२ पदे तसेच सहाय्यक अधीक्षक संवर्गातील ३ पदे उपलेखापाल संवर्गात रुपांतरीत करून ती ३ पदे अश्या एकूण १५ पदांपैकी ९ पदे कोषागार कार्यालय ठाणे येथे व ६ पदे कोषागारे कार्यालय, पुणे येथे वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

तसेच सहसंहचालक, लेखा व कोषागारे, कोकण यांचे कार्यालयातील लेखालिपिक या संवर्गातील १ पद तसेच रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग या तीनही कोषागार कार्यालयातील लेखालिपिक संवर्गातील प्रत्येकी १ पद अशी एकूण ४ पदे ठाणे कोषागार कार्यालयात व सहसंचालक, लेखा व कोषागारे, पुणे कार्यालयातील लेखालिपिक संवर्गातील १ पद व सातारा, सांगली, कोल्हापूर या कोषागार कार्यालयातील वरीष्ठ लिपिक या संवर्गातील प्रत्येकी १ पद पुणे कोषागार कार्यालयात कायमस्वरुपी वर्ग करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०४२११६२६५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( स. हे. भोसले )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :

महालेखापाल ( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ०२१
अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई
सर्व विभागीय उपसंचालक, लेखा व कोषागारे
सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी / उपकोषागार अधिकारी
कार्यासन अधिकारी (प्रशासन -४/अर्थसं.-७/वित्तीय सुधारणा /कोषा- प्रशा १ / २), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
निवड नस्ती ( कोषा. प्रशा. ३ )

---

रोटा/एव-०६२२[ ५००-४-२०११].